**वन्यप्राण्यांपासून होणाऱ्या पिकांच्या, फळझाडांच्या झालेल्या नुकसानीबद्दल आर्थिक सहाय्य अदा करण्यासाठी अवलंबिण्यात येणाऱ्या कार्यपध्दतीमध्ये सुधारणा व पंचनाम्यात सुलभता येण्यासाठी नेमलेल्या समितीच्या फेररचनेस मान्यता देण्याबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**महसूल व वन विभाग,**
**शासन निर्णय क्रमांक : डब्ल्युएलपी-२०१२/प्र.क्र.३२६/फ-१,**
मंत्रालय, मुंबई-४०००३२
दिनांक : २८ सप्टेंबर, २०१५.

**वाचावे** :- १) शासन निर्णय, महसूल व वन विभाग क्र. डब्ल्युएलपी-१०.०८/प्रक्र. २७०/फ-१, दिनांक ०२/०७/२०१०
२) शासन निर्णय, महसूल व वन विभाग क्र. डब्ल्युएलपी-२०१२/प्रक्र. ३२६/फ-१, दिनांक ०५/०९/२०१३
३) शासन निर्णय, महसूल व वन विभाग क्र. डब्ल्युएलपी-०४१३/प्रक्र. १२३/फ-१, दिनांक २५/११/२०१३
४) शासन निर्णय, महसूल व वन विभाग क्र. डब्ल्युएलपी-२०१२/प्रक्र. ३२६/फ-१, दिनांक ०९/०७/२०१५

**प्रस्तावना** :-

वन्यप्राण्यांपासून शेतपिकांचे किंवा फळबागांचे नुकसान झाल्यास दिनांक ०२/०७/२०१०, दिनांक ०५/०९/२०१३, दिनांक २५/११/२०१३ व दिनांक ०९/०७/२०१५ च्या शासन निर्णयानुसार आर्थिक मदतीची रक्कम संबंधितांना अदा करण्यात येते. शेतपिकाच्या नुकसानीची शहानिशा करण्यासाठी उक्त शासन निर्णयामध्ये संबधित वनपाल, सरपंच, ग्रामसेवक/तलाठी व कृषी अधिकारी/फलोत्पादन अधिकारी या चार सदस्यांच्या समितीने १० दिवसांच्या आंत जागेवर जाऊन पंचनामा करणे, नुकसान क्षेत्राची मोजणी करणे, पुरावे तपासणे व नुकसानीचे मूल्य ठरविणे अपेक्षित असते. त्यानंतर उपवनसंरक्षक यांनी घटनेच्या तारखेपासून ३० दिवसांचे आंत नुकसान भरपाईचे आदेश काढणे व आदेश काढल्यानंतर एक महिन्याचे आंत बाधित व्यक्तीस रक्कम अदा करणे ही पध्दत अवलंबिण्यात येत होती. तथापि वेगवेगळया विभागाचे स्थानिक अधिकारी व लोकप्रतिनिधी एकत्र येऊन नुकसानीची शहानिशा करण्यास समितीस होणारा विलंब टाळण्यासाठी व पंचनाम्यात सुलभता येण्यासाठी तसेच प्रत्यक्षात बाधीत शेतकऱ्यांना देय अर्थसहाय्य तत्परतेने देणे शक्य व्हावे म्हणून समितीमध्ये स्थानिकांचा सहभाग व सुसूत्रीकरण करणे व ३० दिवसांचे आंत बाधीत व्यक्तीस आर्थिक सहाय्याची रक्कम अदा करण्यासाठी अवलंबिण्यात येणाऱ्या पध्दतीमध्ये सुधारणा करणे ही बाब शासनाच्या विचाराधीन होती. त्यानुसार शासनाने पुढीलप्रमाणे निर्णय घेतला आहे.

**शासन निर्णय**

वन्यप्राण्यांपासुन होणाऱ्या पिकांच्या, फळझाडांच्या झालेल्या नुकसानीबद्दल आर्थिक सहाय्य अदा करण्यासाठी पुढीलप्रमाणे पध्दत अवलंबिण्यात यावी :-

१) संबंधित शेतकरी पीक नुकसानीची तक्रार सर्व कागदपत्र व पुराव्यासह अधिकारक्षेत्र असलेले नजीकचे वनरक्षक, वनपाल अगर वन परिक्षेत्र अधिकारी यांचेपैकी कोणाकडेही घटना घडल्यापासून ०३ (तीन) दिवसाचे आंत करतील.

२) प्रत्येक प्रकरणी तक्रार प्राप्त झाल्यानंतर (१) वनरक्षक (२) कृषी सहाय्यक (३) तलाठी अशी तीन सदस्यांची समिती नुकसानीची शहानिशा करणे, जागेवर जाऊन पंचनामा करणे, नुकसान क्षेत्राची मोजणी करणे, पुरावे तपासणे व नुकसानीचे मूल्य ठरविणे इत्यादी सर्व कार्यवाही करून आपला अहवाल १४ (चौदा) दिवसांचे आंत संबंधित वन परिक्षेत्र अधिकारी यांना सादर करतील.

३) समितीने सादर केलेला अहवाल संबंधित वन परिक्षेत्र अधिकारी संबंधित सहाय्यक वनसंरक्षक / विभागीय वन अधिकारी / उपवनसंरक्षक यांना ०४ (चार) कामाच्या दिवसांच्या आंत सादर करतील.

४) वन परिक्षेत्र अधिकारी यांनी समितीचा अहवाल सादर केल्यानंतर संबधित सहाय्यक वनसंरक्षक / विभागीय वन अधिकारी / उपवनसंरक्षक प्रत्येक प्रकरणी आर्थिक सहाय्य देण्याचे आदेश ०४ (चार) कामाच्या दिवसांचे आंत किंवा घटनेची तक्रार प्राप्त झाल्यापासून २३ दिवसांचे आंत काढतील.

५) संबंधीत सहाय्यक वनसंरक्षक / विभागीय वन अधिकारी / उपवनसंरक्षक यांनी आदेश काढल्यानंतर ०३ (तीन) कामाचे दिवसांचे आंत किंवा घटनेची तक्रार प्राप्त झाल्यापासून २६ दिवसांचे आंत जे अगोदर घडेल, आर्थिक सहाय्याची रक्कम बाधित व्यक्तीच्या खात्यात जमा करतील किंवा रेखांकित धनादेश हस्तांतरीत करतील.

इतर अटी व तरतुद दिनांक ०२/०७/२०१०, दिनांक ०५/०९/२०१३, दिनांक २५/११/२०१३ व दिनांक ०९/०७/२०१५ च्या शासन निर्णयाप्रमाणे लागू राहतील.

सदर शासन निर्णय, निर्गमीत झाल्याचे दिनांकापासून लागू करण्यात येत आहे.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१५०९२९१३०६५५४५१९ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

APTE ARVIND SHANKAR

Digitally signed by APTE ARVIND SHANKAR
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=WOMEN AND CHILD DEVELOPMENT,CID - 918010, postalCode=400032, st=Maharashtra, cn=APTE ARVIND SHANKAR
Date: 2015.09.29 13:11:55 +05'30'

**(अरविंद आपटे)**
विशेष कार्य अधिकारी
महसूल व वन विभाग

प्रत माहिती आणि उचित कार्यवाहीसाठी :-

१) मा.मुख्यमंत्री यांचे प्रधान सचिव, मंत्रालय, मुंबई.
२) मा.मंत्री (वने) यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई.
३) मुख्य सचिव, महाराष्ट्र राज्य, मंत्रालय, मुंबई.
४) अपर मुख्य सचिव, नियोजन विभाग, मंत्रालय, मुंबई.
५) अपर मुख्य सचिव, वित्त विभाग, मंत्रालय, मुंबई.

६) अपर मुख्य सचिव (कृषी), कृषी व पदुम विभाग, मंत्रालय, मुंबई.
७) प्रधान सचिव (ग्राम विकास), ग्राम विकास व जलसंधारण विभाग, मंत्रालय, मुंबई.
८) महासंचालक, माहिती व प्रसिध्दी, मंत्रालय, मुंबई.
९) प्रधान मुख्य वनसंरक्षक, (वनबल प्रमुख), महाराष्ट्र राज्य, नागपूर.
१०) प्रधान मुख्य वनसंरक्षक (वन्यजीव), महाराष्ट्र राज्य, नागपूर.
११) प्रधान मुख्य वनसंरक्षक व महासंचालक, सामाजिक वनीकरण संचालनालय, महाराष्ट्र राज्य, पुणे.
१२) व्यवस्थापकीय संचालक, महाराष्ट्र राज्य वनविकास महामंडळ, नागपूर.
१३) अपर प्रधान मुख्य वनसंरक्षक (अर्थसंकल्प, नियोजन व विकास), महाराष्ट्र राज्य, नागपूर.
१४) अपर प्रधान मुख्य वनसंरक्षक (वन्यजीव) नागपूर/मुंबई (बोरीवली)/नाशिक.
१५) मुख्य वनसंरक्षक (प्रादेशिक), सर्व.
१६) मुख्य वनसंरक्षक (वन्यजीव), पुणे.
१७) मुख्य वनसंरक्षक तथा क्षेत्र संचालक, मेळघाट व्याघ्र प्रकल्प, अमरावती.
१८) मुख्य वनसंरक्षक तथा संचालक, संजय गांधी राष्ट्रीय उद्यान, बोरिवली.
१९) मुख्य वनसंरक्षक तथा क्षेत्र संचालक, पेंच व्याघ्र प्रकल्प, नागपूर.
२०) मुख्य वनसंरक्षक तथा क्षेत्र संचालक, ताडोबा अंधारी व्याघ्र प्रकल्प, चंद्रपूर.
२१) मुख्य वनसंरक्षक तथा क्षेत्र संचालक, सहयाद्री व्याघ्र प्रकल्प, कोल्हापूर.
२२) वनसंरक्षक तथा क्षेत्र संचालक, नवेगाव-नागझिरा व्याघ्र प्रकल्प, गोंदिया
२३) वनसंरक्षक(वन्यजीव) नाशिक/ ठाणे.
२४) सर्व पोलिस आयुक्त.
२५) सर्व जिल्हाधिकारी.
२६) सर्व पोलिस अधीक्षक.
२७) उपवनसंरक्षक (प्रादेशिक) सर्व.
२८) उपवनसंरक्षक (वन्यजीव), अकोला/औरंगाबाद.
२९) विभागीय वन अधिकारी, सांगली/उस्मानाबाद/बीड / हिंगोली /चिपळूण.
३०) उप विभागीय संगमनेर/मालेगाव/ भोर.
३१) सर्व जिल्हा कृषी अधीक्षक अधिकारी.
३२) महालेखापाल-१/२ (लेखापरीक्षण /लेखा व अनुज्ञेयता), महाराष्ट्र राज्य , मुंबई / नागपूर.
३३) नियोजन विभाग, मंत्रालय, मुंबई - ३२.
३४) वित्त विभाग (व्यय-१० कार्यासन), मंत्रालय, मुंबई - ३२.
३५) वन कक्षातील सर्व कार्यासने, महसूल व वन विभाग, मंत्रालय, मुंबई-३२.
३६) फ-१ कार्यासन, महसूल व वन विभाग, मंत्रालय, मुंबई - ३२ (निवडनस्ती).